


*माझ्या अशा मित्र मैत्रिणींसाठी*

*ज्यांचं ब्रेक-अप झालंय....*

*निराश होऊ नका...थांबू नका...रडू नका....*

*एक नवी पहाट तुमची वाट पाहतेय...*

# नेटाक्षरी वर्ष तिसरे अंक : ११३

## Move on

अतिथी संपादक

हर्षाली पवार ( पुणे)



संपर्क :

Netaksharee@gmail.com

9869674820

नमस्कार मित्रहो!!!!!

"नेटाक्षरी"सोबत काम करायचंय असा मेसेज "ई-साहित्यला" पाठवला आणि लगेच रिप्लाय आला "नक्कि!!!!". खुपच छान अनुभव होता...मजा आली काम करताना....अर्थात पहिल्यांदाच असं काम करत होते. त्यामुळे सुरुवातीला थोड्या अडचणी आल्या. पण नाम काका, सोनाली दी, ग्रीष्म दा, शशांक, ओंकार, प्राजक्त, महेंन्द्रजी, प्रियांका दी या सगळ्यांची खुप मदत झाली..धन्यवाद!!!!

विषय होता "मुव्ह ऑन!!!" माझ्यासाठी माझ्याच आयुष्यातला एक खडतर प्रवास... जाणवलं त्यावेळी अरे असं खूप लोकांसोबत झालं असेल आणि त्यांचीही परिस्थीती "वाळवंटात चालताना तलाव शोधायचा" अशीच झाली असेल.... ती हुरहुर, तळमळ , ते क्षण, ते निरागस प्रेम, तो पहिलाच मोहक स्पर्श, घराच्या पडद्याच्या रंगापासून सगळंच ठरलेलं असतं...अशा वेळी त्या व्यक्तीला विसरणं...म्हणजे पुन्हा पुन्हा आठवण्यासारखंच असतं...

विसरुन जाणं तर शक्यच नसतं..अरे एखाद्या प्राण्यासोबत ४ दिवस राहुन पहा त्याचासुद्धा लळा लागतो...!!! मग हे तर अशक्यच होऊन बसतं... पण "शो मस्ट गो ऑन" गाईज...!!! ठरवा स्वतःच्या मनाशी कि नाही विसरता आलं तर काय झालं पण तडफड्त नाही बसणार....मी पुढे जाणार...जायलाच हवं..प्रेम सोडुनही या जगात करण्यासारखं भरपुर काही आहे... ज्या आई वडिलांनी आपल्याला लहानाचं मोठं केलेलं असतं त्यापुढे आपल्याला चार दिवस आधी भेट्लेल्या व्यक्तीचा जास्त लळा कधीच नसला पाहीजे....

उठा आणि ठरवा स्वतःशी "I MUST MOVE ON...AT LEAST FOR THOSE PPL WHO DESERVE TO SEE SMILE ON MY FACE" तुम्ही नक्की पुढे जाल...कधीही मागे न पहाता!!!!

याबाबतीत व्हॉट्स युअर राशी मधील गाणं खूप काही सांगून जातं.



***"रात लंबी सही,फीर भी एक रात हैं,***

***सुबह हो जायेगी,सौ बातोकी बात हैं,***

***फिर गायेगी ये जमीं,फिर दिल का ईक वास्ता,***

***ले आयेगा समय कहीं,तेरी ऐ मंजील बता,***

***सच तो ये हैं,के होना हैं यु,तो ईन आखों मैं आंसू हैं क्यों??***

***ख्वाब ऐसे बरस जायेंगे,फुल खिल जायेंगे फिर नयें!!"***

*आयुष्य हा किती नागमोडी वळणांचा रस्ता आहे ना!!! त्यातलं प्रत्येकाच्या आयुष्यातलं हवंहवंसं वाटणारं, महत्त्वाचं वळण म्हणजे प्रेम....बर्याचदहेच प्रेम आपल्याला नवनवीन धडे शिकवत असतं..त्यातलाच एक आपणा सर्व तरुण मित्र मैत्रीणींना माहित (चांगलाच अनुभव असतो म्हणा!!)असलेला एक अती महत्त्वाचा धडा म्हणजे ब्रेक-अप (मग ते कुठल्याही कारणासाठी होवो)...प्रेमाची सुरुवात होऊन एक महिना झाला नाही तोवर ब्रेक-अप करण्याचा ट्रेण्ड आहे सध्या...पण जे खरंच मनापासून प्रेम करत असतात त्यांच्यासाठी खडतर वाट असते त्यानंतर..कुणीही कितीही सोबत असलं तरी त्या व्यक्तीची उणीव भरुन निघु शकत नाही खरंच!!!! काहीजण इतके निराश होतात की त्यांचा मार्ग आत्महत्येकडे जातो...मुर्ख असतात.....फक्त स्वतःपुरताच विचार करतात...*

*"TAKE A CHILL PILL YAAR" असं सांगणारे तर भरपुर असतात...पण खरंच त्यावेळी असं सांगणार्याचलोकांचा इतका राग येत असतो ना...कि बस्स!!! असं वाटतं द्यावी एकेकाच्या ठेवुन!!! कारण नाहि समजू शकत आपलं दुःख कोणी...आणि एखाद्या कपलकडे पाहतानासुद्धा स्वतःचाच भास होत असतो...जीव जळतो रे..मग ती गाणी ब्रेक-अप के बाद, लोनलीनेस.....वगैरेच आपली वाटतात...*

*अशा वेळी काही काही जण मागचं विसरुन पुढे जाण्याचा प्रयत्न करतात आणि काही त्या स्वप्नवत जगातच रमुन राहतात...त्यांना त्यातून बाहेर काढणं मग त्यांच्याच हातात असतं....अशा सगळ्या मित्र मैत्रीणींसाठी जे यातून बाहेर यायचा प्रयत्न करताहेत....किंवा इच्छा असुनही त्यातच गुरफट्ली आहेत....त्या सगळ्यांसाठी त्यांच्या आयुष्याला एक हलकीशी प्रेरणा देण्यासाठी हा माझा अंक*

*लेट्स मुव्ह ऑन....!!!!!!!*

*बिकॉज इट्स ऑल गॉन यार!!!!!*

***-हर्षाली पवार***

***harshupawar92@gmail.com***

# तरंगती पानं...........

*अथांग समुद्राच्या मध्यावर*

*एकट्या पसरल्या ओबडधोबड पाषाणावर...*

*'तो'  काखेतले*

*कागद सावरत उभा राहिला...*

*आणि भिरकावत गेला..*

*'तिच्यावर लिहलेल्या कविता.... एकेक करत...*

..

*कविता...भिरकावली एकेक...*

*ही तिच्या जिवघेण्या डोळ्यांची..*

*ही दंव घसरल्या ओठपाकळ्यांची..*

*ही तिच्या चंद्रकोर गोंदल्या भाळावर...*

*ही दिर्घकविता...तिच्या नुसत्या हनुवटीच्या तिळावर...*

*ही फेकली..ओठात अडकल्या अल्लड बटेवर..*

*ही "कशी दिसते?"  म्हणत पहिल्यांदा घातल्या नथेवर..*

*हि झुलत्या जडकुंडलामुळे..हलत्या कानाच्या नाजुक पाळांवर*

*ही कुंडल काढल्यावर उठलेल्या लालनिळ्या वळांवर...*

*हि एका पापणीवर.. गालावर आल्हाद उतरलेली..*

*ही चंबुओठांवर..तळाहातावरुन पापणी फुंकलेली..*

हि ओठ दाबणा-या सळसळ मोतीदातांवर..

हि "नाहिच बोलणार मुळी?" म्हणत मुरडल्या नाकावर....

हि जिवघेण्या,अटळ,बेभान वळणांवर

हि मिठीत असता न सुचलेल्या शब्दांवर..

अशी एक एक..आणि कित्येक

भिरकवत गेला कविता..समुद्रात...

जणु फेकत होता त्याचेच..

अगांग एकेक करत....

कित्येक वर्षांपासुन

जगाच्या कुठल्याशा कोप-यात...

कुठल्याशा समुद्रात...

कुठल्याशा ओबड्धोबड दगडावर...

तो अजुनही फेकतोय तिच्यावरच्या कविता..

आणि ढाळतोय डोळ्यातले खारेपाणी..

त्याच पसरल्या कुठल्याशा समुद्रात..

बस ....

तेव्हापासुन समुद्राची चव खारट आहे..

-प्राजक्त /१९/१०/१०

deshmukh.praj@gmail.com



# आता मी स्वार्थी होणार.....

विस्कटलेला डाव, कोसळलेलं घरटं....
फुटलेलं काळीज अन बिथरलेलं मनं
एकच गुलाब
पण तेही काटेरीच
लाख जपायचा प्रयत्न केलाय
आजवर त्याला
पण शेवटी तेही कोमेजलेच.....
आजवर कोणाकडूनच काहीही मागीतले नाही ....
काहीच नाही
भावशुन्य विश्वात जगत होतो
सगळ्यांना सांभाळत....जपत
स्वतःच्या सावलीलाही घाबरत
स्वतःला दिवसांगणीक मारतच होतो....
मी...... माझे........ माझ्यासाठी.....
ह्या गोष्टींना काही थाराच नव्हता
माझ्या आयुष्यात
जे काही होते ते फक्त तुझेच होते...
तुझ्याचसाठी होते
आपल्या स्वप्नांना मी त्यादिवशीच आग लावलीय
आता त्या सप्तरंगी स्वप्नांची राख
चेह-यावर फासुन
आता जगायचा विचार चाल्लाय.....
कोणी निंदो कोणी वंदो.....
आता कोणासाठीच जगायचे नाही
कोणाचसाठी नाही.....
आता बस्...
मी आणी मी
किंवा कदाचीत
मी विरुध्द मी बस्...
ठरवलेय मी
की आता मी स्वार्थी होणार.....

ओंकार तोरसकर... (omkar.pt@gmail.com)

# गुड बाय...........

मी आत्ता तुला विसरून जायचे ठरवले आहे
तुझ्या आठवणींपासून स्वतःला दूर न्यायचे ठरवले आहे

तुझ्यामध्ये मला अजून नाही गुंतायचेय
स्वतःला आजून नाही दुःखी करून घ्यायचेय

तुझ्यासाठी काही चांगले केले तरी
तू सतत मलाच दोषी धरणार

आणि माझा संबंध नसताना मला बोलणार अन रडवणार
मग मी तरीही आजून का सहन करयचे?

तुझ्या बोलण्याला नेहमी का भुलावे?
तुला मी नेहमी का माफ करावे?

आज मला माझ्या सावलीपासून
म्हणजेच तुझ्यापासून लांब निघून जायचे आहे

माझ्या खोट्या स्वप्नांच्या दुनियेतून बाहेर यायचे आहे
आज मला तुला कायमचे विसरून जायचे आहे

आणि याची सुरुवात

मी तुझा नंबर माझ्या फोन बुक मधून
आणि फ्रेंड लिस्ट मधून डीलीट करण्यापासून करतेय
GOOD BYE TO YOU FORVER AND EVER¤

- प्रियांका देशपांडे

# एक सुरूवात .....

कित्येकदा असंच लिहीत राहीलो...
स्वतःशीच अनेक गोष्टी ठरवत राहीलो
कधीच सगळ्याचा हिशोब लागला नाही...
जस ठरवलं तसं काही घडलच नाही...
वाटा बदलत गेल्या
काळ सरत गेला...
"नशीब माझं फुटकं.."
नाही मी मुद्दाम ते फोडत राहीलो....
खुळेपणा करत राहीलो..
पण आता नाही...
मार्ग दिसलेत..
उत्तरं सापडलीत...
हरएक प्रश्नाची उत्तरं...
एक नवी वाट ....
माझ्यासाठी..
त्या स्वप्नांसाठी.....
प्लीज!!! तिच्यासाठी नाही...
पण तिच्यासवे सुरु होणा-या पुढील प्रवासासाठी.....
एक सुरूवात...
माझ्या स्वतःची¤¤

शशांक नवलकर

# प्रेम नको...मैत्रीच बरी......

रोज आठवण यावी, असं खरंच काही नसतं....
रोजभेट घ्यावी, असंही बरंच काही नसतं..........!

मी विसरणार नाही, याची खात्री तुला आहे....
म्हणूनच तर तुझ्या, प्रेमाची किंमत मला आहे....!

मैत्री आणि प्रेमामध्ये,सर्वकाही माफ असतं....
रुसवे-फुगवे वरवरचे, मन मात्र साफअसतं........!

पूर्वीचं सर्व विसरून, एकदा परत येऊन जा....
निसटलेल्या प्रेमाला, मैत्रीचा हात देऊन जा.........!

सावरणं तुला चांगलं जमतं, अशी खात्री माझी आहे.....
तू विसरलास तरी , माझी आठवण मात्र ताजी आहे.....!!
शब्दांवर निस्सीम प्रेम करणारी एक शब्द-यात्री....

सुप्रिया परांजपे

Paranjape.supriya@gmail.com



## *आताशा...!*

*आताशा येत नाही*
*तुझ्या आठवणीने डोळ्यात पाणी..*
*अन् नकोशीही वाटत नाही*
*शांत सांज दिवाणी..*

*आताशा येत नाही*
*एक कोवळं हळवंपण*
*अन् मनात दाटत नाहीत*
*तुझ्या आठवणीचे गर्द घन*

*आताशा काळजातलं दुःख*
*डोळ्यात येत नाही..*
*कारण मला कळून चुकलयं.*
*कुणावाचूनच कुणाचं,*
*इथं जगणं थांबत नाही.*

-महेंद्र कांबळे.

*(अर्घ्यदान).*

# तू नसताना.....

आता खुप मोकळं वाटतंय...

तू सोबत नसताना...

मी मनसोक्त हसते..

किनार्या वरुन फिरताना...

आभाळ सुनं सुनं अन् अश्रु दाटलेले

आटुन गेले मनात सारे

दुःख कोंडलेले

मन भरुन येतंय

आता एकटंच आईस्क्रीम खाताना

पण खूप मोकळं वाटतंय

आता तू नसताना....





आता पहिल्यासारखी

तुझी आठवण येत नाहि

सतत मनाला तुझ्या मनाकडे

घेऊन जात नाहि

आता हात थांबतात तुझा

नंबर डायल करताना...

खूप मोकळं वाटतंय

तू सोबत नसताना.....

मनातून ठरवलं

तरी सतत हसता येत नाहि

तू लावलेल्या सवयी

जाता जात नाहि

भिजते रात्री उशी

पण मन भिजत नाहि

पण खुप मोकळं वाटतंय

एकटंच रड़ताना

आज खुप मोकळं वाटतंय

तु सोबत नसताना

-हर्षाली पवार

# ई साहित्य प्रतिष्ठान

## बारा लाख मराठी वाचकांसाठी ई चळवळ

नेटाक्षरीचा हा अंक तुम्हाला कसा वाटला? एकूणच हा उपक्रम तुम्हाला आवडला का ? मग तुम्हाला ई साहित्य प्रतिष्ठानबद्दल जाणून घ्यायला नक्कीच आवडेल.

चार वर्षांपुर्वी स्थापन झालेल्या ई साहित्य प्रतिष्ठानने आजवर आपल्या वाचकांना पावणे दोनशेहून अधिक दर्जेदार मराठी ई पुस्तके / नियतकालिके विनामूल्य दिली आहेत. मोरया, मीरा, कृष्णा, गुरुदेव रविंद्रनाथ, स्वा. विवेकानंद, विंदा करंदिकर, ना धों महानोर, ग्रेस , नारायण सुर्वे, लोकमान्य टिळक, छत्रपती शिवाजी महाराज असे एकाहून एक सरस विषय आम्ही घेतले. सुमारे चारशे नवीन साहित्यिकांना या व्यासपीठावरून सादर केले. आमचा प्रत्येक अंक, आमचे प्रत्येक पुस्तक ई मेलच्या माध्यमातून साधारणतः सव्वालाख मराठी वाचकांपर्यंत जातो. जगभरात पसरलेल्या पण मनाने महाराष्ट्रातच असणाऱ्या प्रत्येक वाचकापर्यंत जाण्याचा आमचा प्रयत्न आहे. आम्ही इंटरनेटवर मराठी भाषेतील साहित्य लोकप्रिय करण्याची चळवळ हिरिरीने पुढे नेली. प्रेम आणि सौंदर्याबरोबरच विद्यार्थी आणि शेतकऱ्यांच्या आत्महत्या, दहशतवाद, प्रेमभंगातून येणारी निराशा अशा ज्वलंत विषयांवरचं साहित्य मांडलं. विनोदाला वाहिलेलं ई श्टाप देऊन हसवलं. लहान मुलांसाठी बालनेटाक्षरीची निर्मिती केली. शास्त्रीय संगीताची समज तरुणांत येण्यासाठी संगीत कानसेनचे ई वर्ग चालवले. नव्या कवींसाठी एक भक्कम व्यासपीठ म्हणजे नेटाक्षरी चालवले. तर महाराष्ट्रातल्या किल्ल्यांची माहिती देणाऱ्या पुस्तिकांच्या "दुर्ग दुर्गट भारी" या मालिकेद्वारे महाराष्ट्रातल्याच नव्हे तर जगभरातल्या मराठी मंडळींना मराठमोळ्या इतिहासाची उभारी दिली. लवकरच आमचा ई-यत्ता हा ज्ञानवेध घेणारा उपक्रम सुरू होईल. मराठीचं वैभव जे ज्ञानदेव तुकाराम. अशा संतांच्या पुस्तिकांची एक मालिका आपल्या भॆटीला येईल. केवळ कविताच नव्हे तर कथा कादंबऱ्या आणि गंभीर विषयांवरची पुस्तकेही आपल्याला इथे मिळतील. तर तरुणांमध्ये नव्या जगाला सामोरं जाण्याची हिंमत जागवणारं "उनाड" लवकरच आपल्या भॆटीला येणार आहे.

*सव्वा लाखभर रसिकांपर्यंत दर्जेदार साहित्य नियमितपणे विनामूल्य पोचवण्याची आमची परंपरा आम्ही सातत्याने चालू ठेवूच. आम्हाला हा उत्साह आणि प्रेरणा देणारी आपली पत्रेही येत राहू द्या. पण मनात एक विचार येतो. आपली वाचकसंख्या फ़क्त सव्वा लाखभर लोकांपर्यंत मर्यादित का? जगभरातल्या १२ कोटी मराठी माणसांपैकी निदान १२ लाख वाचकांपर्यंत तरी हे विनामूल्य ई साहित्य पोहोचलंच पाहिजे असं नाही वाटत आपल्याला? आणि त्यासाठी काही फ़ार करायची गरज नाही बंधो. आपल्या ओळखीच्या बारा लोकांची, बारा मराठी लोकांची मेल आय डी द्याल? जास्त दिलीत तर बरंच. पण निदान १२ मित्र किंवा नातेवाईकांची मेल आय डी पाठवा. असे लोक ज्यांनी मराठी साहित्य वाचावे अशी आपली इच्छा आहे. एक लाख लोकांनी जर प्रत्येकी बारा आय डी पाठवले तर लाखाचे बारा लाख व्हायला कितीसा वेळ लागणार?*

*बारा लोकांची मेल आयडी पाठवणाऱ्या वाचकांना आम्ही ई साहित्य पाठीराखे म्हणून वेगळे मानाचे स्थान देऊ. तुम्हाला आमच्या पुढील प्रवासाची कल्पना देत राहू. तुमच्या सूचना मागवू. तुमच्याकडून मार्गदर्शन घेत राहू. आमच्या पुढील प्रवासाचे तुम्ही सहप्रवासी असाल.*

***तर होणार ना ई साहित्यचे पाठीराखे ?***

*फ़क्त आपल्या खास मराठी मित्र नातेवाईकांच्या बारा मेल आय डी खालील पत्त्यावर पाठवा.*

esahity@gmail.com

*खात्री बाळगा, या मेल्सचा कोणत्याही तऱ्हेने गैरवापर केला जाणार नाही. त्यांना जाहिराती किंवा फ़ालतू मेल पाठवून त्रास देणार नाही. यांचा उपयोग केवळ चांगले दर्जेदार मराठी साहित्य पाठवण्यासाठी केला जाईल.*

***esahity@gmail.com***

